**महाराष्ट्र राज्यातील लघू, मध्यम व इतर उपक्रमांना शासन नियुक्त यंत्रणेमार्फत वितरीत करण्यात येणाऱ्या कोळसा वाटपाबाबतच्या मार्गदर्शक तत्त्वांमध्ये सुधारणा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**

**शासन निर्णय क्र. कोळसा-२०२०/ प्र.क्र.७८/ उद्योग-७**

मंत्रालय, मुंबई ४०००३२.

दिनांक २१ जानेवारी, २०२२

<u>संदर्भ</u> :- १. केंद्रीय कोळसा मंत्रालय, भारत सरकार यांचे नवीन कोळसा वितरण धोरण दिनांक १८/१०/२००७.

२. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन परिपत्रक क्र. कोळसा-२००९/प्र.क्र.२९/उद्योग-७, दिनांक ०७/११/२००९.

३. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. कोळसा-२०१४/प्र.क्र.२७५/उद्योग-७, दिनांक १२/०७/२०१६.

४. केंद्रीय कोळसा मंत्रालय, भारत सरकार यांचे नवीन कोळसा वितरण धोरणातील सुधारणा दिनांक २७/०९/२०१६.

५. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. कोळसा-२०१४/प्र.क्र.२७५/उद्योग-७, दिनांक ०१/०१/२०१९.

**<u>प्रस्तावना :-</u>**

केंद्रीय कोळसा मंत्रालय, भारत सरकार यांनी त्यांच्या दिनांक १८/१०/२००७ रोजीच्या आदेशान्वये नवीन कोळसा वितरण धोरण तसेच त्यासंदर्भातच्या मार्गदर्शक सूचना जाहीर केल्या आहेत. त्यास अनुसरुन राज्यातील लघू व मध्यम उद्योग उपक्रमांना शासन नियुक्त यंत्रणेमार्फत वितरीत करण्यात येणा-या कोळशाच्या वाटपाबाबत दिनांक १२/०७/२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारीत मार्गदर्शक तत्त्वे निर्गमित करण्यात आली आहेत. त्यानुसार राज्यातील वार्षिक ४२०० मे. टन वापर असणा-या लघू व मध्यम उपक्रमांना कोळसा वितरण करण्यासाठी सविस्तर निर्देश देण्यात आले आहेत. तद्नंतर केंद्रीय कोळसा मंत्रालयाने त्यांच्या दिनांक २७/०९/२०१६ रोजीच्या आदेशान्वये दिनांक १८/१०/२००७ रोजीच्या धोरणामध्ये सुधारणा केली असून त्याअन्वये राज्यातील वार्षिक १०,००० मे. टन वापर असणा-या लघू, मध्यम व इतर उपक्रमांना राज्य नियुक्त यंत्रणेमार्फत कोळसा वितरण करण्यासाठी मंजूरी देण्यात आली आहे. त्यास अनुसरुन तसेच विभागाकडे प्राप्त झालेली निवेदने तसेच शासन नियुक्त यंत्रणेचे अभिप्राय विचारात घेता, यासंदर्भात अधिक पारदर्शक पद्धतीने कोळसा वाटप करणेकरीता यापूर्वी दिनांक १२/०७/२०१६ रोजीच्या शासन निर्णयान्वये निर्गमित मार्गदर्शक तत्त्वांमध्ये आवश्यक सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

१. संदर्भ क्र.०३ येथील शासन निर्णय क्र. कोळसा-२०१४/प्र.क्र.२७५/उद्योग-७, दिनांक १२/०७/२०१६ मध्ये *"राज्यातील वार्षिक ४,२०० मे. टन वापर असणा-या लघू व मध्यम उपक्रमांना कोळसा वितरण करण्यासाठी शासन स्वतंत्र आदेशाद्वारे शासन नियुक्त यंत्रणेची विहीत कालावधीसाठी नियुक्ती करेल"* अशी तरतूद आहे.

या वाक्यामध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे :-

"राज्यातील वार्षिक १०,००० मे. टन वापर असणा-या लघू, मध्यम व इतर उपक्रमांना कोळसा वितरण करण्यासाठी शासन स्वतंत्र आदेशाद्वारे शासन नियुक्त यंत्रणेची विहीत कालावधीसाठी नियुक्ती करेल."

२. संदर्भ क्र.०३ येथील दिनांक १२/०७/२०१६ च्या शासन निर्णयातील परि. क्र. ४.१ मध्ये "*उद्योग घटकाने कोळसा वाटपाबाबतचे स्वयंघोषित प्रमाणपत्र द्यावे. उद्योग घटकांची तांत्रिक तपासणी ६ महिन्यांच्या आत करणे बंधनकारक आहे*" असे नमूद आहे.

या वाक्यामध्ये पुढीलप्रमाणे सुधारणा करण्यात येत आहे :-

"ज्या उद्योग घटकाद्वारे मात्रा व क्षमता निर्धारण प्रमाणपत्र सादर करण्यात येईल त्याच उद्योग घटकाला कोळसा वितरण करण्यात यावे."

३. संदर्भ क्र.०३ येथील दिनांक १२/०७/२०१६ च्या शासन निर्णयातील परि. क्र. ६.२ मध्ये ६.२ (ड) नव्याने समाविष्ट करण्यात येत असून ते पुढीलप्रमाणे आहे:-

"कोणत्याही उद्योग घटकाबाबत तक्रार प्राप्त झाल्यास शासन नियुक्त यंत्रणा त्या उद्योग घटकाची तपासणी करेल व तपासणी नंतर कोळसाची अफरातफर आढळल्यास व तक्रार योग्य आढळल्यास त्या उद्योग घटकाची सुरक्षा ठेव जप्त केली जाईल आणि जेवढ्या कोळसा मात्राची अफरातफर सिध्द झाली आहे तेवढ्या कोळसा मात्राची किंमत त्या उद्योग घटकाकडून वसुल करण्यात येईल. कोळश्याची रक्कम जमा न केल्यास पोलिसात तक्रार करण्यात येईल आणि त्या उद्योग घटकास काळ्या यादीत टाकण्यात येईल."

४. उपरोक्त अनु. क्र. १ ते ३ येथील सुधारणा वगळता कोळसा वाटपाबाबत यापूर्वी दिनांक १२/०७/२०१६ व दिनांक ०१/०१/२०१९ रोजीच्या शासन निर्णयातील उर्वरीत तरतूदी कायम राहतील, याची सर्व संबंधित यंत्रणांनी नोंद घ्यावी. तसेच राज्यातील लघू, मध्यम व इतर उपक्रमांना कोळसा वितरण अधिक पारदर्शक पद्धतीने करण्याबाबत शासन नियुक्त यंत्रणेकडून खालील तरतूदी प्राथम्याने अंमलात आणाव्यात :-

I) शासन नियुक्त यंत्रणेने कोळसा वितरणासंदर्भात लवकरात लवकर सर्वसमावेशक ई-पोर्टलची निर्मिती त्यांच्या तरतूदीतून करावी. त्यामध्ये राज्यातील उद्योग घटकांसाठी CIL यांच्याकडून कोळशाच्या वाटपाकरीता आवंटन प्राप्त झालेला तपशील, उद्योगघटकाने करावयाची ऑनलाईन अर्ज पध्दती, मात्रा व क्षमता निर्धारण प्रमाणपत्र अपलोड करणे, जिल्हा स्तरीय वाटप समितीचा निर्णय, उद्योग घटकनिहाय कोळशाची मागणी, कोळसा वापराबाबतचा तपशील इत्यादी बाबींचा समावेश असेल. तसेच उद्योग घटकाने किती कोळसा कोणत्या खाणीतून, कोणत्या GPS प्रणालीयुक्त ट्रक ने प्राप्त केला, त्याकरीता किती रक्कम भरणा केली त्याविषयक तपशील याची दर महिन्याला ई-पोर्टलवर माहिती अद्ययावत करण्याची जबाबदारी उद्योग घटकाची राहील. त्यासाठी Code शासन नियुक्त यंत्रणा देईल. सदर ई-पोर्टल अद्ययावत ठेवण्याची जबाबदारी शासन नियुक्त यंत्रणेची राहील.

II) शासन नियुक्त यंत्रणेमार्फत वाटप करण्यात येणा-या कोळशाची वाहतूक करणा-या वाहनांकरीता GPS प्रणाली लवकरात लवकर विकसित करण्यात येवून या प्रणाली आधारे कोळसा खाणीपासून उपक्रमापर्यंत करण्यात येणारी कोळशाची वाहतूक सनियंत्रित करण्याबाबत सविस्तर आराखडा शासन नियुक्त यंत्रणेने विकसित करावा. तसेच त्या आराखड्याचा अंमल लवकरात लवकर करावा. या प्रयोजनार्थ होणारा खर्च शासन नियुक्त यंत्रणेने त्यांच्या तरतूदीतून करावा.

III) उद्योग घटकाने Delivery Order च्या आधारे WCL/ CIL कडून निश्चित केलेल्या खाणीतून कोळसा प्राप्त करुन घेण्यासाठी GPS प्रणालीयुक्त वाहनांचाच वापर करावा व त्याबाबतचा ई-पोर्टलवरील तपशील वेळोवेळी अद्ययावत करावा. कोळसा खाणीपासून उपक्रमापर्यंत करण्यात येणा-या कोळशाच्या वाहतूकीवर देखरेख व सनियंत्रण ठेवण्याची जबाबदारी ही शासन नियुक्त यंत्रणेची राहील.

IV) राज्यातील लघू, मध्यम व इतर उपक्रमांना कोळसा वाटप अधिक पारदर्शक पध्दतीने होईल यामध्ये कोणत्याही पध्दतीची अफरातफर, कोळशाचे अन्य ठिकाणी अनावश्यक वहन इत्यादी बाबींना अटकाव करण्याच्या दृष्टीने व कोणत्याही तक्रारींना वाव राहणार नाही अशा त-हेची पध्दत विकसीत करण्याची दक्षता शासन नियुक्त यंत्रणेने घ्यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्र.२०२२०१२११२१६२६२४१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sanjay Shamkant Degaonkar

Digitally signed by Sanjay Shamkant Degaonkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=INDUSTRY, ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=de0a2ca7914a3c02f24aa23655f609f41f2d36b0ec57da4c71f19aaf08230a79, serialNumber=56cf8c8577584adc42f070185c585c41084cc34f6683553d21ccacbfa33d4d1f, cn=Sanjay Shamkant Degaonkar
Date: 2022.01.21 13:20:40 +05'30'

**(संजय देगांवकर)**

**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. विरोधीपक्ष नेते, विधान परिषद व विधान सभा, महाराष्ट्र विधानमंडळ, मुंबई.
२) राज्यातील सर्व सन्माननीय संसद सदस्य.
३) सर्व सन्माननीय विधानसभा व विधानपरिषद सदस्य.
४) मा. राज्यपाल महोदयांचे सचिव.
५) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव.
६) मा. मंत्री(उद्योग)/ मा. राज्यमंत्री (उद्योग) यांचे खाजगी सचिव.
७) मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव.
८) विकास आयुक्त (उद्योग), उद्योग संचालनालय, मुंबई-३२.
९) सर्व विभागीय आयुक्त/ सर्व महसूल विभाग.
१०) जिल्हाधिकारी (सर्व जिल्हे)
११) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य खनिकर्म महामंडळ मर्या., नागपूर.
१२) संचालक, भुविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर.
१३) उद्योग सहसंचालक, मुंबई, ठाणे, पुणे, नाशिक, अमरावती, औरंगाबाद व नागपूर (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत)
१४) सर्व महाव्यवस्थापक, जिल्हा उद्योग केंद्र (सर्व जिल्हे) (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत)
१५) सर्व उपविभागीय अधिकारी, सर्व महसूल उपविभाग (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत)
१६) सर्व तहसिलदार (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत)
१७) सर्व खनिकर्म अधिकारी, जिल्हाधिकारी कार्यालय (उद्योग संचालनालय, मुंबई यांच्यामार्फत)
१८) निवडनस्ती (उद्योग-७).